GR-200107291745822001-1100

केंद्र शासनाच्या विद्युत अधिनियम २००३अन्वये केंद्र शासनाने व राज्य शासनाने पार पाडावयाच्या जबाबदा-या व राज्यशासनास सल्ला देण्याकरिता तज्ञ समितीची नियुक्ती.

**महाराष्ट्र शासन**

उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,

शासन निर्णय क्र.इसीए २००३/प्र.क्र.८५७९/ऊर्जा-५

मंत्रालय,मुंबई-४०००३२.

दिनांक:- १२.११.२००३.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाचा विद्युत अधिनियम २००३ दिनांक १० जुन २००३ पासून अंमलात आला असून सदर अधिनियमानुसार केंद्र शासन व राज्य शासनाने पार पाडावयाच्या जबाबदा-यांपैकी काही प्रमुख जबाबदा-या खालील प्रमाणे आहेत :-

१. अधिनियमाच्या कलम ३ नुसार, केंद्र शासनाने, राज्य शासन व केंद्रीय विद्युत प्राधिकरणाशी विचार विनिमय करुन राष्ट्रीय विद्युत धोरण व वीज दर धोरण तयार करावयाचे आहे. राष्ट्रीय विद्युत धोरणाच्या अनुषंगाने केंद्रीय विद्युत प्राधिकरणाने राष्ट्रीय विद्युत योजना तयार करावयाची आहे. राष्ट्रीय विद्युत योजनेच्या मसुद्यावर वीज निर्मिती कंपन्या, परवानाधारक कंपन्या व जनतेकडून अभिप्राय मागविले जातील व केंद्र शासनाच्या मंजुरीनंतर ती अधिसूचित केली जाईल.

२. अधिनियमाच्या कलम ४ नुसार, केंद्र शासनाने राज्य शासनांशी विचार विनिमय करुन ग्रामीण भागासाठी स्टॅंड अलोन सिस्टिम (वितरण विभागाशी संलग्न असणारी वीज निर्मिती कंपनी) बाबतचे धोरण तयार करावयाचे आहे.

३. अधिनियमाच्या कलम ६ नुसार, गावे व वाडयांसहित सर्व भागाला वीज पुरवठा करण्याची जबाबदारी राज्य शासनावर टाकण्यात आली आहे.

४. अधिनियमाच्या कलम १४ च्या आठव्या परंतुकानुसार, राज्य शासनाने ग्रामीण भाग अधिसूचित करावयाचा आहे.

५. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.इसीए-२००३/प्र.क्र.८५७९/ऊर्जा-५, दि.२४/९/२००३ व शुध्दिपत्रक १/१०/२००३.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाचा विद्युत अधिनियम, २००३ दि.१० जून, २००३ पासून अंमलात आला आहे. सदर अधिनियमानुसार केंद्र शासन व राज्य शासनाने पार पाडावयाच्या जबाबदाऱ्या विहीत केल्या आहेत. त्यामधील तरतुदीनुसार राज्य शासनास सल्ला देण्याकरिता श्री.पी.अब्राहम, माजी केंद्रीय ऊर्जा सचिव, व महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाचे माजी अध्यक्ष यांचे अध्यक्षतेखाली उपरोक्त अ.क्र.५ येथील दि.२४/९/२००३ च्या शासन निर्णयान्वये एक तज्ञ समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर समितीमध्ये सदस्य सचिव व सदस्यांची नेमणूक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री.पी.अब्राहम यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या तज्ञ समितीचे सदस्य सचिव म्हणून श्री.ए.डी.शेळजी, तांत्रिक सदस्य (वितरण) यांच्या ऐवजी श्री.एम.एन.आपटे, तांत्रिक संचालक (सेवानिवृत्त) यांची सदस्य सचिव पदी नेमणूक करण्यात येत आहे. श्री.आपटे यांची समितीचे सदस्य सचिव म्हणून नेमणूक केल्याने श्री.शेळजी हे समितीचे सदस्य म्हणून कार्यरत राहतील. त्याचप्रमाणे सदर समितीमध्ये खालील अधिकाऱ्यांची सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे:-
आवळा

१) श्री.र.ना.अंबरित, उप सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) श्री.एस.प्रभाकरन, भाप्रसे, (सेवानिवृत्त) सल्लागार (EDUSAT) ISRO, बंगलोर.

३) श्री.विनायक नारवीन कुर्वे, इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट फायनान्स कंपनी लि. मुंबई.

४) श्री.कुणाल कुमार, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.

समितीची कार्य कक्षा शासन निर्णय समक्रमांक दि.२४/९/२००३ मध्ये नमूद केल्यानुसार राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( जयंत कावळे)
शासनाचे सचिव (ऊर्जा)

प्रति,

महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.